**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : गौखनि -३४/०६१४/प्र.क्र. २५१/ख

महसूल व वन विभाग
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक:२५/०८/२०२०

विषय : **गौण खनिज-औरंगाबाद**
मौजे नेवरगांव, ता. गंगापूर या वाळूगटातून मंजूर वाळूचे उत्खनन न करता आल्याने प्रमाणशीर रक्कम परत करण्याबाबत.
श्री. विशाल संभाजी कुदळे

**शासन ज्ञापन:-**

जिल्हाधिकारी औरंगाबाद यांना त्यांचे पत्र क्रमांक २०१४/मशाका-२/गौख/कावि-३२५ दि. १२/०६/२०१४, व क्र. २०१४/मशाका-२/गौख/कावि-५०४ दि. ०१/०९/२०१४, २०१८/ मशाका-/गौख/कावि-६८८,दि. १६/०६/२०१८, २०१९/मशाका-१/गौख/कावि-६३७ दि. २८/ ११/ २०१९, च्या उपरोक्त विषयावरील पत्रांस अनुलक्षून असे कळविण्यात येते की, तत्कालीन मा. राज्यमंत्री महसूल यांनी दिनांक १५/०३/२०१३ रोजीच्या आदेशान्वये सन २००९-१० या वर्षाकरीता औरंगाबाद जिल्ह्यातील मौजे नेवरगांव या वाळूगटास दिनांक ३०/०९/२०१३ पर्यंत उत्खनन करण्यास परवानगी दिली होती. सदर वाळूगटातील ८१२७ ब्रास वाळूसाठ्याचा लिलाव सर्वोच्च बोलीने रु. ८१,००,०००/- एवढ्या रकमेस श्री. विशाल संभाजी कुदळे यांना मंजूर करण्यात आला होता.

मौजे नेवरगांव या वाळूगटाचा ताबा लिलावधारकास देण्यात आला. लिलावधारकाने सक्शनपंपाची मागणी केल्यानुसार शासनपत्र दिनांक २२/०८/२१३ अन्वये मौजे नेवरगाव, ता. गंगापूर या वाळूगटातून सक्शन पंपाद्वारे दिनांक ३०/०९/२०१३ पर्यंत वाळू उत्खननाची परवानगी देण्यात आली होती.

तहसिलदार गंगापूर व उपविभागीय अधिकारी वैजापूर यांनी मौजे नेवरगांव, या वाळूपट्यात ओव्हरलोड वाळू वाहतूक करणाऱ्या वाहनांची तपासणी केली असता मोठ्या प्रमाणात क्षमतेपेक्षा जास्त वाळू वाहतूक करणारी वाहने आढळून आली. सदर पकडलेल्या वाहनांच्या वाहतूक पावत्यांची तपासणी केली असता १५ पावत्या कलर झेरॉक्स असल्याचे /आढळून आले आहे. त्याअनुषंगाने जिल्हा खनिकर्म अधिकारी यांनी दिनांक ०७/०९/२०१३ रोजी नेवरगाव या वाळूगटास भेट देऊन तपासणी पूर्ण होईपर्यंत वाळू वाहतूक न करण्याच्या सूचना देण्यात आल्या.

दरम्यान लिलावधारक यांनी तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांचेकडे सदर वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत करणे अथवा मुदतवाढ मिळण्याबाबत अर्ज दाखल केला. सदर अर्ज मा. मंत्री (महसूल) यांनी मा. राज्यमंत्री (महसूल) यांचेकडे सुनावणी घेऊन निर्णय घेण्यासाठी वर्ग केला. तत्कालीन मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दिनांक १७/०७/२१४ रोजी लिलावधारक यांना उत्खनन न करता आलेल्या वाळूसाठ्याची प्रमाणशीर रक्कम परत करण्यात यावी असे आदेश पारीत केले.

तसेच, लिलावधारक यांनी मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र. ११०७२/२०१७ दाखल केली. मा. उच्च न्यायालयाने सदर याचिकेमध्ये दिनांक १८/१२/२०१७ रोजी चार महिन्यांत निर्णय घेण्याचे आदेश पारित केले आहेत. त्याअनुषंगाने मौजे नेवरगाव, ता. गंगापूर या वाळूगटाकरीता लिलावधारक श्री. विशाल संभाजी कुदळे यांना उत्खनन न करता आलेल्या वाळूसाठी प्रमाणशीर रक्कम रु. १५,७८,७२५/- एवढ्या रकमेचा परतावा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सबब, श्री. विशाल संभाजी कुदळे यांना रक्कम रु. १५,७८,७२५/- (रुपये पंधरा लाख अठ्याहत्तर हजार सातशे पंचवीस फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची, यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याबाबीवर होणारा खर्च सन २०२०-२१ यावर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

६.. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८२५१४२९२८०८१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

GAJANAN DHARMA DABHILKAR

Digitally signed by GAJANAN DHARMA DABHILKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f6398a3105d0cebbc1a00f25241de3304637656082108e1227c13033d76bfe, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=69c2bd0a657d8ab9b87341301d9ac56408774af7b6416010e1d362583c71ffd6, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=GAJANAN DHARMA DABHILKAR
Date: 2020.08.25 14:42:03 +05'30'

**(ग. ध. दाभिळकर)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी औरंगाबाद, औरंगाबाद.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.

४) जिल्हा कोषागार अधिकारी औरंगाबाद, औरंगाबाद.

५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.

६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.

७) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.